सन २०२४-२५ करीता मिशन वात्सल्य या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत प्राप्त निधी वितरीत करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- वात्सल्य-२०२४/प्र.क्र.४९/का-०८**
नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक-१७ मे, २०२४

**वाचा:-**

उप आयुक्त (बाल विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. मराबासंस/लेखा/अनुदान मागणी/२०२४-२५/का-३/३८७ दि.२२/०४/२०२४

**प्रस्तावना:-**

मिशन वात्सल्य योजनेअंतर्गत बालकांची काळजी घेणाऱ्या संस्थांमधील कर्मचारी व त्याकरीता राज्यात कार्यरत यंत्रणेमध्ये कार्यरत कर्मचाऱ्यांचे वेतन देखील अदा करण्यात येत असते. सद्यस्थितीत बालकांची काळजी व संरक्षण करणाऱ्या संस्थेमध्ये सेवा देणे ही अत्यावश्यक सेवेची बाब असल्याने हे कर्मचारी त्यांची सेवा देत आहेत. तरी या अत्यावश्यक सेवेतील कर्मचाऱ्यांचे वेतन देखील वेळेत होणे गरजेचे आहे.

या योजनेंतर्गत सन २०२४-२५ करीता अर्थसंकल्पीत निधीतून ३७ शासकीय बालगृह/निरिक्षणगृहातील कार्यरत कर्मचाऱ्यांच्या वेतनाकरीता आवश्यक निधी सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य बाल संरक्षण सोसायटी, पुणे तथा आयुक्त, महिला व बाल विकास यांना वितरीत करण्याची बाब शासन विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

मिशन वात्सल्य योजनेअंतर्गत विवरणपत्रातील लेखाशिर्ष/उद्दीष्टांना रकाना क्र.४ प्रमाणे सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य बाल संरक्षण सोसायटी, पुणे तथा आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांना या शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत आहे.

(रुपये लक्ष)

| अ.क्र. | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पीत निधी | वितरीत करण्यात येणारा निधी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | मागणी क्र.एक्स-०१<br>२२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण,<br>१०२, बाल कल्याण,<br>(१६) शासकीय संस्था,<br>(१६)(०१) एकात्मिक बाल सरंक्षण योजना<br>(२२३५ C००९), केंद्र हिस्सा,<br>०१, वेतन | १९६३.२५ | ३०१.०० |
| २ | मागणी क्र.एक्स-०१<br>२२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण,<br>१०२, बाल कल्याण,<br>(१६) शासकीय संस्था,<br>(१६) (०२) एकात्मिक बाल संरक्षण योजना राज्य हिस्सा<br>(२२३५ C०१८), राज्य हिस्सा,<br>०१, वेतन | ९१२.२० | ६५४.०० |
| **एकूण** | | **२८७५.४५** | **९५५.००** |

२. सदर निधी वितरणाकरिता सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य बाल संरक्षण सोसायटी, पुणे तथा आयुक्त, महिला व बालविकास आयुक्तालय, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर योजनेअंतर्गत उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र विहीत नमुन्यात शासनास सादर करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी यांची राहील.

३. सदर निधी आहरण व विनियोगाच्या अनुषंगाने केंद्रशासन व राज्यशासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचना, वित्त विभागाचे निर्देश यांचे अनुपालन होईल याची दक्षता नियंत्रक अधिकारी व आहरण यांची राहील.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक सं.क्र.१२३/व्यय-६ दि.०९/०५/२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०५१७१५२००६५९३० असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NILESH JANARDAN PATIL

Digitally signed by NILESH JANARDAN PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=b7f57a5d2af23fdb37cfec3c30cfe085ddbef06ea381e7e81401a472bbb966f7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B7D8429F943427129A6A081EE223FEAC961CDD926C4D3542C55A470F22A7C7AE, cn=NILESH JANARDAN PATIL
Date: 2024.05.17 16:09:25 +05'30'

**( डॉ. निलेश ज. पाटील )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष/ सदस्य, विधानसभा/ विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. मा.मंत्री, महिला व बाल विकास यांची खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव,मंत्रालय,मुंबई
७. प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
१०.महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
११.महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
१२.सर्व सहसचिव /उपसचिव/ अवर सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.उपायुक्त (बाल विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे
१४.कार्यक्रम व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य बाल संरक्षण सोसायटी, पुणे.
१५.कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-६/ अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई
१६.कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का-१४७२), मंत्रालय, मुंबई
१७.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सदर निधी बी.डी.एस. प्रणालीवर वितरीत करण्याच्या विनंतीसह अग्रेषित.
१८. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
१९.सर्व कार्यासने, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२०.निवड नस्ती, का-०८.